**राज्यातील कृषी व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य. (समायोजन).सन २०१४-२०१५.( योजनेत्तर)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय, क्र.निधिवि-२०१४/प्र.क्र.५१/ऊर्जा-३,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ४ मार्च , २०१५

**संदर्भ:-** १. शासन निर्णय उद्योग,उर्जा व कामगार विभाग क्र. विपुअ-२०१२/प्र.क्र.९१/ऊर्जा-३ दिनांक ११ ऑक्टोबर २०१२

२. शासन निर्णय उद्योग,उर्जा व कामगार विभाग क्र. टॅरिफ- २०१२/प्र.क्र.९१ भाग २/ऊर्जा ३ दिनांक ०५ मार्च, २०१३

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय दिनांक ११/१०/२०१२ अन्वये राज्य शासनाकडून कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत देण्यात येते. त्यानुसार माहे जूलै २०१४ ते सप्टेबर २०१४ या कालावधीमध्ये कृषिग्राहक व यंत्रमागधारक यांना वीजदरात देण्यात येणा-या सवलतीपोटी शासनाकडून महावितरण कंपनीला रु.११८० कोटी इतके अनुदान वितरीत करावयाचे आहे. परंतु विद्यमान वित्तीय वर्षात महावितरण कंपनीकडून विद्युत शुल्क व वीज विक्रीकरापोटी माहे जून २०१४- ते ऑगस्ट - २०१४ या तिमाही कालावधी करीता प्रतिमाह रु.३१५ कोटी प्रमाणे एकूण रु.९४५ कोटी एवढी रक्कम शासनास देय आहे.

सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात रु.१०५००,००,००,०००/-(दहा हजार पाचशे कोटी फक्त)(मूळ तरतूद रु.९०००कोटी अधिक पुरवणी मागणी रु.१५००कोटी)इतकी अर्थसंकल्पीय तरतूद आहे. आतापर्यंत रु.८२४९,११,००,०००/-( रुपये आठ हजार दोनश एकोणपन्नास कोटी अकरा लाख फक्त)इतकी रक्कम महावितरण कंपनीस वितरीत करण्यात आली आहे. आता वितरीत करावयाच्या रु.११८०,००,००,०००/- (रुपये अकराशे ऐंशी कोटी फक्त) पैकी रु.९४५,००,००,०००/-इतकी रक्कम समायोयजनाद्वारे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना वितरित करण्यासंदर्भात खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली रक्कम रु.११८०,००,००,०००/- (रुपये अकराशे ऐंशी कोटी फक्त) पैकी रु.९४५,००,००,०००/- (रुपये नऊशे पंचेचाळीस कोटी फक्त) समायोजनाने वितरित करण्यास या निर्णयाव्दारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-६, मुख्यलेखाशीर्ष -२८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण,८०० इतर खर्च,(००)(०१) कृषिविषयक व यंत्रमागविषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण/पारेषण अनुज्ञप्तीधारकांना अर्थसहाय्य (योजनेतर) (२८०१२६१५) ३३ अर्थसहाय्य" या खाली खर्ची टाकावा व तो सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. समायोजनाद्वारे वितरीत करावयाची रक्कम रु.९४५,००,००,०००/- महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांचेकडून शासनास येणे असलेल्या रकमेपोटी वसूल करण्यात यावी आणि खाली नमूद केलेल्या जमालेखाशिर्षाखाली समायोजनाव्दारे जमा करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १ | वित्तीय वर्ष सन २०१४-२०१५ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची उर्वरित रक्कम. | ८७०,००,००,००० | ००४३, विजेवरील कर व शुल्क, १०१ विजेचा वापर व विक्री यावरील कर, (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रकमा (००४३ ००९२) |
| २ | वित्तीय वर्ष सन २०१४-२०१५ या वर्षातील विजेच्या विक्रीवरील करापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची उर्वरित रक्कम. | **७५,००,००,०००/-** | ००४३, विजेवरील कर व शुल्क, १०१ विजेचा वापर व विक्री यावरील कर, (०१) (०३) महाराष्ट्र विजेच्या विक्रीवरील कर (००४३ ००८३)(सुधारणा) अधिनियम २००४ |
| | | **९४५,००,००,०००** | |

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई यांनी त्यांच्या अखत्यारित आणि अधिकारात वरील विवरणपत्रानुसार सदर रक्कम रु.९४५,००,००,०००/- (रुपये नऊशे पंचेचाळीस कोटी फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

४. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्यायने रु.९४५ कोटीचे देयक तयार करण्यात येवू नये

५. या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत असलेली रक्कम वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या कॅश फलोच्या ( मासिक वितरण) मर्यादेत आहे

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ६१/२०१५ वित्त विभाग व्यय-१६, दि.१७/०२/२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या वित्त विभागाच्या मान्यतेने करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत सथळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०३०४१५०२०७४०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas M Rajurkar
Date: 2015.03.05 15:29:59 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत**

१) व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी मर्या.,प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०० ०२०.
३) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई-४०० ०२०.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, (अराप/रालेवि-१), मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
८) निवासी लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई.
९) अवर सचिव (रोख), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) क.अ.(प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) वित्त विभाग/(अर्थसंकल्प-१३/साधनसंप-ती/साऊ/व्यय-१६),मंत्रालय,मुंबई-३२,
१२) मुख्य अभियंता (विद्युत),सां.बा., बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई ४०० ००१.
१३) व्यवस्थापकीय संचालक, महासुत्रधारी कंपनी मर्या., हॉगकॉंग बॅंक बिल्डींग, फोर्ट, मुंबई.
१४) निवड नस्ती. (ऊर्जा-३) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.